केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्श्याचे सर्वसाधारण घटकासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत...

**(लेखाशीर्ष २२१५ २१८९)**

# महाराष्ट्र शासन

## पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१९/प्र.क्र. ६०४/पापु-१६

७ वा मजला, जी.टी.रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १७ मार्च, २०२०.

**वाचा -**

**१)शासन परिपत्रक क्रमांक, वित्त विभाग:** अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३,दिनांक ०१ एप्रिल,२०१९.

**२) शासन परिपत्रक क्रमांक, वित्त विभाग:** अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दिनांक ०८ जुलै, २०१९.

**३) शासन निर्णय क्रमांक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग:** स्वभामि २०१९/प्र.क्र.६०४/पापु-१६, दिनांक १३ जानेवारी,२०२०.

**४) शासन परिपत्रक क्रमांक, वित्त विभाग:** अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक २२ जानेवारी, २०२०.

**५) शासन निर्णय क्रमांक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग:** स्वभामि २०१९/प्र.क्र.६०४/पापु-१६,दिनांक १३ मार्च, २०२०.

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (ग्रा.) राज्य हिश्श्याच्या सर्वसाधारण घटकाखाली २२१५ २१८९ या लेखाशीर्षांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता रूपये ६२०.५१०४ कोटी (रूपये सहाशे वीस कोटी, एकावन्न लक्ष, चार हजार) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. तथापि, सुधारित अंदाजानुसार रूपये १००००.००लक्ष इतका निधी (रूपये शंभर कोटी) इतका निधी अर्थसंकल्पित केलेला आहे. सदर रूपये १००००.०० लक्ष इतका निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण (BEAMS) प्रणालीद्वारे वितरणासाठी उपलब्ध करून दिलेला आहे. सदर निधीमधून वाचा ३ व ४ येथील शासन निर्णयानुसार राज्य हिस्सा अनुक्रमे रूपये २३७७.२७लक्ष (रूपये तेविस कोटी, सत्याहत्तर लक्ष, सत्ताविस हजार फक्त ) व रूपये रूपये ६९५३.४३ लक्ष ( रूपये एकोणसत्तर कोटी,

त्रेपन्न लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) इतका निधी बीम्स प्रणालीवरून वितरित करण्यात आलेला असून रू. ६६९.३० लक्ष इतका निधी शिल्लक आहे. सदर शिल्लक रूपये ६६९.३० लक्ष (रूपये सहा कोटी,एकोणसत्तर लक्ष, तीस हजार फक्त) इतका निधी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (ग्रा.) राज्य हिश्श्याच्या सर्वसाधारण घटकाखाली २२१५ २१८९ या लेखाशीर्षांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता रूपये ६२०५१.०४ लक्ष (रूपये सहाशे वीस कोटी, एकावन्न लक्ष, चार हजार) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. तथापि, सुधारित अंदाजानुसार रूपये १००००.०० लक्ष इतका निधी (रूपये शंभर कोटी) इतका निधी अर्थसंकल्पित केलेला आहे. सदर रूपये १००००.०० लक्ष इतका निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण (BEAMS) प्रणालीद्वारे वितरणासाठी उपलब्ध करून दिलेला आहे. सदर निधीमधून वाचा वाचा ३ व ४ येथील शासन निर्णयानुसार राज्य हिस्सा अनुरकमे रूपये २३७७.२७ लक्ष (रूपये तेविस कोटी, सत्याहत्तर लक्ष, सत्ताविस हजार फक्त ) व रूपये रूपये ६९५३.४३ लक्ष ( रूपये एकोणसत्तर कोटी, त्रेपन्न लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) इतका निधी बीम्स प्रणालीवरून वितरित करण्यात आलेला असून रू. ६६९.३० लक्ष इतका निधी शिल्लक आहे. सदर शिल्लक रूपये ६६९.३० लक्ष (रूपये सहा कोटी, एकोणसत्तर लक्ष, तीस हजार फक्त) इतका निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी खर्चाबाबत संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांना स्वतंत्रपणे कळविण्यात येईल. सदर अनुदान हे सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

०२. “राज्यस्तरावर संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेली रूपये ६६९.३० लक्ष (रूपये सहा कोटी, एकोणसत्तर लक्ष, तीस हजार फक्त) इतकी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रूपये ६६९.३० लक्ष (रूपये सहा कोटी, एकोणसत्तर लक्ष, तीस हजार फक्त) इतकी रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्रीम. सुनिता केसकर),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून सह सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प

व्यवस्थापन कक्ष (श्री.अभय महाजन), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्रीमती सुनिता केसकर),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी रूपये ६९५३.४३ लक्ष( रूपये एकोणसत्तर कोटी त्रेपन्न लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून स्वतंत्र धनादेशान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे."

०३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी,या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ)या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान शासन आदेशाशिवाय खर्च करू नये.

इ) अट क्र.३-अ आणि ३-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

ई) सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे /आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

उ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९, क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९ व शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक २२ जानेवारी,२०२० मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पूर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

०४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ मलप्रणाल व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, (०२) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रम (०२)(०५) स्वच्छ भारत मिशन (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) ३३, अर्थसहाय्य, (२२१५ २१८९ ) " या लेखाशीर्षाखाली घालावा. सदर अनुदन सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९ व क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दिनांक ०८ जुलै, २०१९, अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून

निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल,२०१९ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीची तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१७०९५१५०२२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2020.03.17 12:57:12 +05'30'

**( स्मिता.स.राणे )**

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, सर्व.
५. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता).
६. सह सचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
११. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
१२. नियोजन विभाग, (का.क्र.१४४३), मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग, (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.